अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रन्थमाला – ९४

महर्षी दयानंद सरस्वती

# गोकरुणानिधी

मराठी अनुवाद व संपादन
प्रा. डॉ. धनंजय बेडदे

प्रधान संपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन प्रकाशन विभाग



कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | – | **गोकरुणानिधी** |
| **मराठी अनुवाद व संपादन** | – | **प्रा. डॉ. धनंजय बेडदे** |
| **प्रधान संपादक** | – | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | – | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक मंडल** | – | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीना गाणु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | – | **२०२०** |
| **आवृत्ति** | – | **प्रथम** |
| **मूल्य** | – | **रू. ११५/–** |
| **आय.एस.बी.एन.** | – | ९७८–९३–८५७१०–५१–३ |
| **मुखपृष्ठ** | – | **श्री. उमेश पाटील, क.का.सं.वि., रामटेकम्** |
| **मुद्रक** | – | **शिवनेरी ऑफसेट, नागपूर.** |
| **प्रकाशक** | – | **कुलसचिवः,**<br>**कविकुलगुरु–कालिदास–संस्कृत–विश्वविद्यालयः,**<br>**प्रशासकीयभवनम्, मौदामार्गस्य, रामटेकम्.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek  
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi  
Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# गोकरुणानिधिचा इतिहास

करुणानिधी दयामय दयानंदानी त्यांच्या कार्यकाळात गाय इथ्यादि मुक्या प्राण्यांच्या रक्षणाकरिता मोठे आंदोलन उभे केले होते. व्हाईसरॉय तसेच भारत सरकारकडे दोन कोटी भारतवासियांच्या सह्यांचे विनंती अर्ज पाठविण्यासाठी मोठे प्रयत्न केले होते. यासाठी अनेक मान्यवर व्यक्तींना पत्रेही लिहिली होती. जी त्यांच्या 'पत्र और विज्ञापना' मध्ये छापली गेलेली आहेत. पंडित देवेंद्रनाथ संग्रहित पृष्ठ ६५७ प्रमाणे स्पष्ट होते की, या प्रार्थना पत्रावर उदयपूरचे महाराणा श्री सज्जनसिंह, जोधपूरचे महाराजा यशवंतसिंह (१*), शाहपूराधीस नाहरसिंह आणि बुंदीच्या महाराजांनीही स्वाक्षऱ्या केल्या होत्या. अनेक महान व्यक्तींनी या देशोन्नतीच्या कामात मोठ्या उत्साहाने भाग घेतला होता.(२*) हा महान उद्योग महर्षी दयानंद सरस्वतीच्या अकाळी काळाच्या पडद्याआड जाण्याने अपूर्ण राहिले.या प्रयत्नाच्या सोबतच, या कामाला चालना मिळावी या उद्देशाने ऋषींनी गोकरुणानिधी नावाचा ग्रंथ लिहिला.

---

तळटीप :

(१) महाराणा सज्जनसिंहानी गाय इत्याादि उपयोगी पशूंची हत्या बंद करण्याच्या विषयात जोधपूर नरेश महाराज जसवंतसिंहाना पत्र लिहून सल्ला मागितला होता. महाराज जसवंतसिंहानी या महत्त्वाच्या पत्राचे उत्तर सं.१९३९, पौष वद्य ५, मंगळवार (सन १८८२ तारीख २९ डिसेंबर) अशा प्रकारे दिले

''माझी प्रजा १४,६१,१५६ हिंदू व १,३७११९ मुसलमानांनी हे तीन पशू (गाय, बैल आणि म्हैस) न मारले जावेत. या व्यवस्थेसाठी संमती दर्शविली आहे आणि त्याला माझी पण संमती आहे. सं. १९३९ पौष वद्य ५.''

हस्ताक्षर – राजराजेश्वर महाराजाधिराज

खास खूण जसवंतसिंह, मारवाड, जोधपूर

जोधपूर नरेशाचे वरील पत्र आमचे स्वर्गीय मित्र, जोधपूर निवासी, श्री ठाकूर जगदीशसिंहजी गहलोतनी आपल्या 'राजपूताने का इतिहास' नावाच्या ग्रंथात प्रथम भागाच्या पृष्ठ १८७ वर उद्‌धृत केले आहे. श्रीमान गहलोतजींनी त्यांची एक प्रतिलिपी जोधपूरहून माझ्याकडे पाठविली आहे.

(२) यासाठी 'ऋषि दयानंद को लिखे गये पत्र और विज्ञापन भाग ४' च्या प्राक्कथन चे १० वे प्रकरण (पृष्ठ ५० ते ५२ पाहा.)

गोकरुणानिधीत दोन भाग आहेत. प्रथम भागात, गाय इत्यादी पशुंना मारून खाण्यापेक्षा त्यांचे रक्षण करून, त्यांच्या दुध-तुपाद्वारे किती तरी जास्त माणसांना लाभ होतो, ही गोष्ट गणिती आकड्याद्वारे स्पष्ट करून दाखविली आहे. मांसाहाराचे अवगुण तसेच शाकाहारी भोजनाचे महत्त्व पटवून दाखविले आहे. दुसऱ्या भागात गोरक्षणासाठी स्थापन होणाऱ्या सभेच्या नियमोपनियमाचे वर्णन केले आहे.

ऋषींच्या १२ जानेवारी १८८१ च्या पत्राने माहीत होते की, त्यांनी आग्रा येथे 'गोरक्षिणी सभा' स्थापन केली होती. तिचे नियम व उपनियमही बनविले होते. (पाहा 'पत्र और विज्ञापन - भाग १' पृष्ठ ४३६, ओळ २०-२१) संभव आहे की हेच नियमोपनियम गोकरुणानिधीच्या दुसऱ्या भागात छापले असतील.

**रचनाकाळ :**

या पुस्तकाचा काळ, ग्रंथाच्या शेवटी अशा प्रकारे लिहिला आहे-

**''मुनिरामाङ्कचन्द्रेऽब्दे सहस्यस्यासिते दले ।**
**दशम्यां गुरुवारेऽलंकृतोऽयं कामधेनुपः।।''**

**अर्थात** - सं.१९३९ फाल्गुन वद्य १० गुरुवार, २४ फेब्रुवारी १८८१ या दिवशी हा ग्रंथ अलंकृत (= पूर्ण) झाला.

खरेतर ग्रंथाच्या शेवटी दिलेला काळ ग्रंथ रचना पूर्ण झाल्याचा बोधक नाही तर त्याच्या छपाईचा आहे, हे पुढील उदाहरणावरून व्यक्त होते. म्हणून या ग्रंथाची रचना याच्यापूर्वी झाली होती.

**ग्रंथरचना काळाचा अनुमान :**

जरी ग्रंथ रचनेचा निश्चित काल माहीत नाही, तरीही ऋषी दयानंदांच्या १२ जानेवारी १८८१ (सं. १९३९, पौष शु १२ बुधवार) ला आगऱ्याहून पाठविलेल्या पत्राने माहिती मिळते की, गोकरुणानिधीची रचना संभवत: १२ जानेवारी १८८१ च्या पूर्वी केली होती. ऋषी दयानंद लिहितात - ''येथे एक गोरक्षिणी सभा स्थापन केली आहे आणि तिचे नियमोपनियमही बनविले आहेत. जेव्हा ते छापले जातील तेव्हा ते तुम्हाला सूचनार्थ पाठविले जातील.''

– पत्र और विज्ञापन भाग १, पृष्ठ ४३६, ओळ २०–२१.

गोकरुणानिधीच्या शेवटच्या भागात गोकृष्यादि रक्षिणी सभेचे जे नियमोनियम छापले आहेत ते शक्य आहे तेच असतील, ज्यांचा उल्लेख पूर्व उद्धृत पत्रांशात केलेला आहे. यावरुन हे अनुमान केले जाऊ शकते की, गोकरुणानिधीची रचना १२ जानेवारी १८८१ च्या जवळपास झाली असावी.

स्वामीजींच्या जीवन चरित्रानुसार ते सं. १९३७ नि. अग्रहन कृष्ण १० किंवा ११ ते फाल्गुन शु. १० (२७ किंवा २८ नोव्हेंबर १८८० ते १० मार्च १८८१) पर्यंत आगऱ्यात राहिले होते. पंडित देवेंद्रनाथांनी संग्रहित केलेल्या जीवन चरित्रातील पृष्ठ क्र. ६३० अनुसार विदित होते की, हा ग्रंथ छापून, आगऱ्यातच स्वामीजींना प्राप्त झाला होता. त्यांचा उल्लेख अशा प्रकारचा आहे –

''स्वामीजींनी आगऱ्यात 'गोकरुणानिधी' नावाचा ग्रंथ रचला होता आणि तो छापून आगऱ्यातूनच स्वामीजींना मिळाला होता. रामरतन नावाच्या एका पुजाऱ्याने त्याच्या ६७ रु. च्या प्रति विकल्या होत्या.''

ऋषी दयानंदांनी ३ मार्च १८८१ ला मुलराजला पाठविलेल्या पत्रात लिहिले होते की –

''आपण २८ फेब्रुवारीस लिहिलेले पत्र मिळाले. वर्तमान समजले. तुम्हा गोकरुणानिधी निश्चित प्राप्त झाल्याचे कळले.''

–पत्र और विज्ञापन भाग १, पृष्ठ ४८५, ओळ १०,११

या पत्रावरून हे स्पष्ट होते की, पुस्तकाच्या शेवटी छापलेली सं.१९३७ फाल्गुन वद्य १० (२४ फेब्रुवारी १८८१) तिथी पुस्तक छापून तयार झालेली आहे. हे संभव आहे की, ऋषी दयानंदांच्या आज्ञेनुसार पुस्तक छापून तयार होताच, प्रेस मधून परस्पर लाला मूलराजला पाठविले होते व ते मूलराजला २८ फेब्रुवारीला मिळाले होते.

**द्वितीय संस्करण :**

पंडित भीमसेनने ऋषी दयानंदाच्या नावे लिहिलेल्या पत्राने असे विदित होते की, गोकरूणानिधीचे प्रथम संस्करण खूप लवकर संपले होते आणि एका वर्षाच्या आतच दुसरे संस्करण प्रकाशित करावे लागले. पुस्तकाच्या इतक्या मोठ्या विक्रीचे कारण ऋषी दयानंदांनी चालविलेले गोरक्षा आंदोलन

होते.

४ मे १८८२ ला भीमसेनला पाठविलेल्या पत्रात शेवटी, दयाराम, प्रबंधक वैदिक यंत्रालय (प्रयाग) यांनी लिहिले आहे -

''......... मासिक वेदभाष्याचा अंक आणि गोकरुणानिधी जी नवीन छापलेली आहे ....... पाठविली आहे.''

-पत्र आणि विज्ञापन भाग ३, पृष्ठ ३४१ (३*)

यावरून असे दिसते की, गोकरुणानिधीचे द्वितीय संस्करण एप्रिल १८८२ मध्ये छापून तयार झाले होते.

**इंग्रजी अनुवाद :**

ऋषी दयानंदांची अशी इच्छा होती की, गोरक्षा आंदोलन यशस्वी करण्यासाठी, या पुस्तकाचा इंग्रजी अनुवाद करवून घेऊन, इंग्लंडमधील ब्रिटीश सरकारच्या अधिकाऱ्यांकडे पाठवावा. म्हणून त्यांनी याच्या इंग्रजी अनुवादासाठी, लाला मूलराज एम.ए. यांना कितीतरी पत्रे पाठविली. त्यांनी याचा इंग्रजी अनुवाद करण्याचे मान्य करूनही खूप दिवस झाले तरी, हे काम केले नाही यासंबंधी लाल मूलराजच्या नावे लिहिले पत्र भाग १, पत्र संख्या ४३८, भाग २ पत्र संख्या ४५८, ४७७ पाहण्यायोग्य आहे. पत्र सं. ५२७ मध्ये ऋषी लिहितात-

''मोठ्या खेदाची गोष्ट आहे की, तुम्ही आता पर्यंत (जवळ जवळ पंधरा महिन्यात) गोकरुणानिधीचा इंग्रजी अनुवाद केला नाही. आम्हाला निराश होऊन येथे मुंबईत अन्य व्यक्तीकडून इंग्रजीत अनुवाद करवावा लागला. आता तुम्ही हे काम करू नये.''

-पत्र और विज्ञापन भाग २, पृष्ठ ५६१, ओळ १ ते ३

गोकरुणानिधीचा इंग्रजी अनुवाद प्रकाशित करण्यासंबंधात लाला सेवकलाल, कृष्णदास, मंत्री, आर्य समाज, मुंबई यांनी स्वामीजींना २० जानेवारी १८८३ ला असे लिहिले होते की, ''गोकरुणानिधीचे झालेले इंग्रजी भाषांतर आम्ही छापण्याचा निश्चय केला आहे. परंतु लाहोरमध्ये 'आर्य' नावाचे मासिक प्रकाशित होते. त्यात प्रथम छापून त्याचे पुस्तक बनवावे. त्यामुळे या पुस्तकाच्या अनुकूल अथवा प्रतिकूल मते व्यक्त होतील, तीही त्याच्यासोबत विवेचन रुपात छापता येऊ शकतील. या बद्दल आपला काय

अभिप्राय आहे, ते कृपया लिहून पाठवा'' (पत्र और विज्ञापन भाग ३, पृ. २९५, ओळ २९ पासून पृ. २९६ वरील ओळ ५ पर्यंत.)

महर्षी दयानंदांनी करवून घेतलेला गोकरुणानिधीचा इंग्रजी अनुवाद त्यावेळस प्रकाशित झाला किंवा नाही ते आम्हाला समजू शकले नाही.

**लाला मूलराज यांनी अनुवाद न करण्याचे कारण :**

जेव्हा लाला मूलराजनी गोकरुणानिधीचा इंग्रजी अनुवाद १५ महिन्यात करून दिला नाही, तेव्हा शेवटी निराश होऊन स्वामीजींनी त्याच्या इंग्रजी अनुवादाचे काम मुंबईत अन्य व्यक्तीकडून करवून घेतले, हे आम्ही वर लिहिले आहेच. गोकरुणानिधी सारख्या अतिशय लहान ग्रंथाचा अनुवाद करण्यासाठी १५ महिने पर्यंत त्यांना वेळ मिळाला नाही. ही गोष्ट आम्हाला समजत नाही. निश्चितच याचे कारण त्यांचे मांस भक्षणच होते. म्हणूनच त्यांनी गोकरणानिधीचा इंग्रजी अनुवाद केला नाही. ज्यात मांस भक्षणाचे खंडण होते.

**लाल मूलराजचे छुपे मांस भक्षण :**

आमची समजूत आहे की, लाला मूलराज सुरुवातीपासूनच मांस भक्षणाच्या बाजूने होते, म्हणूनच त्यांनी गोकरुणानिधी सारख्या ग्रंथाचा, जो त्यांच्या विचाराच्या विरुद्ध होता, जाणूनबुजून इंग्रजी अनुवाद केला नाही. १५ महिने स्वामीजी महाराजांना त्याचा इंग्रजी अनुवाद करण्याचे आश्वासन देत राहिले. लाला मूलराजचे अनुयायी नेहमी म्हणत व लिहीत असत की, लाल मूलराजच्या मांस भक्षण विषयक विचारांची माहिती स्वामी दयानंदांना होती, तरीही लाला मूलराजला आर्य समाज आणि परोपकारिणी सभेचा सभासद बनविले होते. ''आमच्या मते हे कथन सर्वथा असत्य आहे. आमचा दृढ विश्वास आहे की, लाला मूलराज आपल्या मांस भक्षणाला शेवट पर्यंत स्वामीजी पासून लपवित राहिले.'' याचे प्रत्यक्ष प्रमाण, श्रीमती परोपकारिणी सभेची ती प्राथमिक कार्यवाही आहे, जी अजमेरच्या 'देश हितैषी' नामक मासिक पत्रात खंड १, अंक १०, माद्य सं. १९४० वि. मध्ये छापली आहे. त्यातील लेख अशा प्रकारचा आहे.

''नंतर श्रीराव बहादूर गोपाल हरी देशमुखांनी निम्नलिखित स्वामीजींचा सिद्धांत सांगितला आणि म्हणाले की यावेळेस दूरदूरच्या स्थानावरून आर्यलोक उपस्थित झाले आहेत, सर्वांनी माहीत करून घ्यावे की, स्वामीजींचा सिद्धांत

काय आहे. जेवढे होईल तेवढे त्यानुसार आचरण करावे. मंत्रसंहिता वेद आहेत. ब्राह्मण इत्यादी वेद नाहीत. वेदांत कोणत्याही जीव जंतूच्या हत्येची आज्ञा नाही. वेदांत सर्व सत्य विद्येचे मूळ आहे. पाषाण मूर्ती पूजा वेद विरुद्ध आहे. ईश्वर निराकार, सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वव्यापक, अजर, अमर, नित्य, पवित्र इत्यादी आहे. त्याची उपासना करणे योग्य आहे. जी गोष्ट नीती व बुद्धीच्या विरुद्ध आहे, तो धर्म नाही. वेदांचा अधिकार सर्व वर्णांना आहे. कर्म आणि गुणांनी वर्ण ठरतो. वीर्याने नाही. जोपर्यंत शक्य होईल तेवढे बालविवाहापासून दूर राहून ब्रह्मचर्य राखावे. वायू शुद्धीसाठी हवनाची आवश्यकता आहे. मृत व्यक्तींना भोजन इत्यादी कदापि पोहचत नाही. वेदाच्या आज्ञेनुसार सर्व मनुष्यांनी देशाबाहेर व द्वीपाबाहेर प्रवास करावा. आर्यांनी शिक्षणाचा प्रसार करावा आणि प्राचीन ग्रंथांचे पठण-पाठण करावे. संधीसाधू लोकांनी त्यात इकडचे-तिकडचे स्वार्थासाठी काही मिसळेले असल्यास, त्याला वेदाच्या कसोटीवर परीक्षण करून दूर करावे. यावर सर्व सभासदांच्या स्वाक्षऱ्या घेतल्या गेल्या व सर्वांनी त्या उत्साहाने केल्या.(४*)

यावर ज्या १० व्यक्तींनी स्वाक्षऱ्या केल्या. त्यात लाला मूलराजही आहेत. जेव्हा या कार्यवाहीत 'वेदात कोणत्याही जीव जंतूला मारण्याची आज्ञा नाही. हे स्पष्ट घोषित केले आहे, तेव्हा मांस भक्षणाला वेद विरुद्ध न मानणाऱ्या लाला मूलराजजींना याचा अवश्य विरोध करायला पाहिजे होता. जेथे हे वाक्य लिहिलेले असेल, त्यावर स्वाक्षरी करायला नको होती. हस्ताक्षर केल्याने, हे स्पष्ट होत की, लाला मूलराजा मध्ये स्वामीजींच्या समोरच काय, त्यांच्या मृत्युनंतरही इतक्या लवकर आपले विचार प्रकट करण्याची हिम्मत नव्हती, म्हणून त्यांनी काहीही कुरकूर न करता त्यावर स्वाक्षरी केली.

लाला मूलराजच्या कुटील स्वभावाचे एक उदाहरण कमलनयन शर्माच्या ३-७-१८८३ च्या पत्रात सापडते. कमलनयन शर्मांनी लिहिले आहे-

''...... सरदार भगतसिंह इंजिनिअर झाले आहेत. त्यांच्या ऑफिसात मीही काम करतो. ते म्हणत होते की गुजरातमध्ये मूलराज एम.ए. मला भेटले होते आणि आर्य समाजाला पक्षपाती म्हणत होते.''

–पत्र और विज्ञापन, भाग ३, पृ. ३९७, ओळ–१२–१४

ज्या सत्यप्रिय दयानंदांनी मुंबईच्या हरिश्चंद्र आणि मुरादाबादच्या मुन्शी इंद्रमणी सारख्या प्रसिद्ध व्यक्तींना धर्माविरुद्ध आचरण केल्यावरून आर्य समाजातून काढून टाकले. थियोसोफिकल सोसायटी सारख्या संस्थेशी नाते तोडले, महाराणा उदयपूर तसेच महाराजा कश्मीर इत्यादीच्या मूर्तीपूजेविषयीच्या प्रार्थनेला ठोकरले, जोधपूर नरेशाच्या वेश्यागमनाला फटकारले, त्यांनी लाला मूलराजला मांसभक्षी आहे असे माहित असूनही आर्य समाज आणि परोपकारिणी सभेचे सदस्य म्हणून राहू दिले असे कोणता बुद्धिमान माणूस मान्य करेल? अशा अवस्थेत आपल्या वेद विरुद्ध मांस भक्षणाला योग्य सिद्ध करण्यासाठी परम सत्य वचनी, आप्त महर्षी वर अशा प्रकारचाा खोटा आरोप लावणे महानीचतेचे काम आहे.

ज्या व्यक्तींना या विषयात अधिक माहिती जाणून घेण्याची इच्छा आहे त्यांनी 'आर्य धर्मेंद्र जीवन' (संस्करण ४) चे पं. आत्मरामजी द्वारा लिखित उपोद्धात पृष्ठ १२४ ते १२७, महात्मा हंसराजजी कृत 'दस प्रश्नों की समीक्षा' आणि दी. ब. हरविकासजी रचित 'वर्क्स ऑफ दि महर्षि दयानंद के ग्रंथो का इतिहास' या ग्रंथाचा 'वेद भाष्य और सत्यार्थ प्रकाश' (सं. २) यातील मांस भक्षण प्रकरण ''शीर्षक सहा'' परिशिष्ट पाहायला पाहिजे.

(संदर्भ– महर्षि दयानंद सरस्वती के ग्रंथों का इतिहास (आवृत्ती १९८३) या ग्रंथातून अनुदित)

***

# गोकरुणानिधीचे परमभक्त, एक पारशी सद्गृहस्थ

अमर शहीद स्वामी श्रद्धानंद महाराजांनी त्यांच्या 'कल्याण मार्ग का पथिक' या पुस्तकाच्या, पृष्ठ २२४ वर एक आठवण लिहिली आहे.

एक अनुभव मुंबईत घडलेला मला आठवतो. जेव्हा मी गावी परतण्यासाठी रेल्वे-स्टेशनवर पोहचलो तेव्हा तेथे पारशी समाजातील एक प्रतिष्ठित व्यक्ती, माझी वाट पहात उभी होती. त्यांनी मोठ्या प्रेमाने पुष्पहाराने माझे स्वागत केले आणि सप्रेम भेट म्हणून थोड्या केळी माझ्या स्वाधीन केल्या अपरिचित व्यक्तीकडून अचानक झालेल्या सत्काराने मी आश्चर्यचकीत झालो. ते म्हणाले, ''आपण गोंधळून का जाता महाराज! मी स्वामी दयानंद सरस्वतींचा मतानुयायी नाही. पण त्यांच्या गोकरुणानिधीचा भक्त आहे. आर्य समाजाला स्वामीजींच्या ज्या उपदेशांचा विसर पडला आहे. त्याचे मी अनुकरण करीत आहे.'' असे म्हणून त्यांनी त्यांच्या गोरक्षेविषय़ीच्या छोट्या पुस्तिका आणि प्रसिद्धी पत्रके दिली. त्याद्वारे ते सरकारला गोहत्या बंदी साठी निवेदन देऊ इच्छित होते आज माझ्याजवळ त्यांनी मला दिलेली प्रसिद्धी पत्रके नाहीत. म्हणून मी सांगू शकत नाही की ते महाशय आजचे महान गोभक्त श्रीमान जस्सावालाच होते की, अन्य कोणी सज्जन.

म्हणून आर्य सार्वदेशिक सभा तसेच प्रांतीय आर्य प्रतिनिधी सभेचे हे परम कर्तव्य आहे की, गोहत्या बंदी आंदोलनात तन, मन, धन, अर्पण करून सक्रीय सहयोगाने भारत भूमीवरील गोहत्येचा कलंक कायमचा मिटवावा आणि मानव जातीचा प्राणाधार, गोमातेच्या रक्षण व संवर्धनात समर्पित व्हावे. प्रत्येक परिवाराने हे व्रत घ्यावे की, आम्ही गोदुग्धच सेवन करू, गोपालन रु!''

***

**ओ३म् नमो नमः। सर्वशक्तिमते जगदीश्वराय ।।**

# भूमिका

**इन्द्रो विश्वस्य राजति । शन्नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ।।**

**– य.अ. ३६ । मं. ८ ।।**

**तनोतु सर्वेश्वर उत्तमम्बलं गवादिरक्षं विविधं दयेरितः ।**
**अशेष विघ्नानि निहत्य नः प्रभु सहायकारी विद्धातु गोहितम् ।।१।।**
**ये गोसुखं सम्यगुशन्ति धीरास्ते धर्म्मजं सौख्यमथा ददन्ते**
**क्रूरा नराः पापरता न यन्ति प्रज्ञाविहीनाः पशुहिंसकास्तत् ।।२।।**

ते धर्मात्मा विद्वान लोक धन्य आहेत, जे ईश्वराच्या गुण, कर्म, स्वभाव, अभिप्राय, सृष्टी क्रम, प्रत्यक्षादि प्रमाण आणि आप्तांच्या आचरणानुसार वागून, सगळ्या जगाला सुख देतात आणि त्या लोकांच्या बाबतीत दुःख आहे, जे यांच्या विरुद्ध स्वार्थी दयाहीन होऊन, जगात हानी करण्यासाठी विद्यमान आहेत. पूजनीय जन तर ते आहेत. जे आपले नुकसान झाले तरीही सगळ्यांच्या हितासाठी आपले तन, मन, धन अर्पण करतात आणि तिरस्कारणीय ते लोक आहेत, जे आपल्या फायद्यात संतुष्ट राहून, सगळ्यांच्या सुखाचा नाश करतात.

जगात असा कोणता मनुष्य असेल, जो स्वतः सुख आणि दुःख मानत नाही! असा कोणता तरी मनुष्य आहे काय की, ज्याचा गळा कापला अथवा त्याचे रक्षण केले तर तो दुःख आणि सुखाचा अनुभव करणार नाही? जेव्हा सगळ्यांना लाभ आणि सुखातच प्रसन्नता वाटते. तेव्हा अपराधाशिवाय कोणत्याही प्राण्याचे प्राण हरण करून, आपले पोषण करणे, हे सत्पुरुषासमोर निंद्य कर्म का होणार नाही का? सर्वशक्तिमान जगदीश्वर या जगात मनुष्याच्या आत्म्यात, आपल्यातील दया आणि न्यायाला प्रकाशित करो, ज्यामुळे सगळे दया आणि न्यायमुक्त होऊन, सर्वदा सर्वोपकारक काम करोत आणि स्वार्थ त्यागून, पक्षपात विरहित होऊन, कृपा पात्र गाय इत्यादी पशूंचा विनाश न करो, की ज्यामुळे दुग्धजन्य पदार्थ व शेती आदि कामांच्या सिद्धीने, सर्व माणसे आनंदात राहोत.

या ग्रंथात जे काही कमी अधिक अथवा अयोग्य लेखन झाले असेल

तर त्याला बुद्धिमान लोकांनी, या ग्रंथाच्या तात्पर्याच्या अनुकूल करून घ्यावे. धार्मिक विद्वानांची हीच योग्यता आहे की, वक्त्यांच्या वचनांचा आणि ग्रंथ कर्त्यांचा अभिप्रायानुसार समजून घ्यावे. हा ग्रंथ याच अभिप्रायाने रचला आहे की, ज्यामुळे गाय आदि पशू, जितके सामर्थ्य असेल तेवढे वाचविले जावेत आणि त्यांना वाचविल्याने दूध, तूप मिळून आणि शेती सुधारून, सगळ्यांचे सुख वाढत राहो. परमात्मा कृपा करो की, अभीष्ट त्वरीत सिद्ध होवो.

या ग्रंथात तीन प्रकरणे आहेत - एक समीक्षा, दुसरा नियम आणि तिसरे उपनियम. याकडे लक्ष देऊन विचार करून, राजा तसेच प्रजेने यथायोग्य आचरण करावे म्हणजे दोघांचेही सुख वाढेल.

।। इति भूमिका ।।

***

॥ ओ३म्॥

# अथ गोकरुणानिधिः ॥

## (गोकृष्यादि रक्षिणी सभा)

## प्रकरण १ अर्थ – समिक्षा

या सभेचे नाव "**गोकृष्यादि रक्षिणी सभा**" यासाठी ठेवले आहे की, ज्यामुळे गाय आदि पशू व कृषि आदि कामाचे रक्षण व वृद्धी होऊन, सर्व प्रकारचे उत्तम सुख, मनुष्यादि प्राण्यांना प्राप्त होतो आणि याशिवाय पुढे लिहिलेले सुख कधीही प्राप्त होऊ शकत नाही.

सर्वशक्तीमान् जगदीश्वराने या सृष्टीत जे जे पदार्थ बनविले आहेत ते निष्प्रयोजन नाही, परंतु एक-एक वस्तू अनेक-अनेक प्रयोजनासाठी रचली आहे. यासाठी त्यांच्यापासून त्याच प्रयोजनासाठी उपयोग करणे न्यायाला धरून आहे अन्यथा अन्याय होईल. पाहा, ज्यासाठी हा डोळा बनविला, त्याच्याकडून ते कार्य घेणे सगळ्यांना उचित असते, त्याचे पूर्ण प्रयोजन न घेता जे जे पदार्थ बनविले आहेत, त्या त्यापासून ते ते प्रयोजन न घेता, त्यांना प्रथमच नष्ट करून टाकणे, सत्पुरुषांच्या मतानुसार वाईट काम नाही का? पक्षपात विरहीत होऊन पाहा, गाय आदि पशूपासून ऋषी आदि कर्मांनी सगळ्या जगाला, असंख्य सुख होत आहे की नाही? जसे दोन आणि दोन चार होतात, तसे या सत्य विद्येने जे जे विषय जाणले जातात, ते अन्य मार्गाने कधीही ज्ञात होऊ शकले नसते.

जर एक गाय कमीत कमी दोन शेर दूध देते व दुसरी वीस शेर, तर सरासरीने प्रत्येक गायीचे अकरा शेर दूध नि:शंकपणे मिळेल या हिशेबाने एक महिन्यात सव्वा आठ मण दूध होते. एक गाय कमीत कमी सहा महिने व दुसरी जास्तीत जास्त अठरा महिन्यांपर्यंत दूध देते, तर सरासरीने प्रत्येक गाय बारा महिने दूध देते. या हिशेबाने बारा महिन्याचे दूध नव्याण्णव मण होते. या दूधाला आटवून, प्रति शेर एक छटाक तांदूळ व दीड छटाक साखर टाकून, खीर बनविली तर, प्रत्येक माणसासाठी, दोन शेर दुधाची खीर भरपूर होते. कारण

की, ही सुद्धा सरासरी मापे आहेत, कोणी दोन शेरापेक्षा जास्त वा कमी खाईल. या हिशेबाने एका प्रसुता गायीपासून १९८० (एक हजार नऊशे ऐंशी) लोक एका वेळेस तृप्त होतील. गाय किमान आठ व कमाल अठरा वेळेस व्याते. याची सरासरी तेरा आली तर २५७४० (पंचवीस हजार सातशे चाळीस) माणसे एका गायीच्या जन्मभराच्या दुधापासून एक वेळ तृप्त होतात.

या गायीच्या एका पिढीत सहा कालवडी व सात गोऱ्हे झाले तर त्यातून एकाचा मृत्यु, रोग आदि कारणाने होणे संभव आहे. त्या सहा कालवडींच्या, फक्त दुधापासून वरील प्रकारे १५४४४० (एक लाख चौपन्न हजार चारशे चाळीस) माणसांचे पालन होऊ शकते. राहिले सहा बैल, एका वर्षात एका जोडीकडून २०० (दोनशे) मण अन्न उत्पन्न होऊ शकते. अशा प्रकारे ३ जोड्या ६०० (सहाशे) मण अन्न उत्पन्न करू शकतात आणि त्यांच्या कार्याची सरासरी आठ वर्षे आहे, या हिशेबाने ४८०० मण अन्न उत्पन्न करण्याची क्षमता, एका जन्मात, तीन जोडींची आहे.

४८०० मण अन्नाने, प्रत्येक माणसास तीन पाव अन्न धरले तर २५६००० (दोन लाख छपन्न हजार) माणसांचे एका वेळचे जेवण होते. दूध आणि अन्न मिळून पाहिले तर, निश्चितच ४,१०,४४० (चार लाख दहा हजार चारशे चाळीस) माणसाचे पोषण एक वेळच्या जेवणाने होते. आता सहा गायींच्या पिढ्यान्‌पिढ्यांचा हिशेब करून पाहिले तर असंख्य माणसाचे पालन होऊ शकते आणि यांच्या मांसापासून अंदाजे केवळ ऐंशी मांसाहारी, एका वेळेस तृप्त होऊ शकतात. पहा! तुच्छ लाभासाठी, लाखो प्राण्यांना मारून, असंख्य माणसाचे नुकसान करणे महापाप नाही का?

यद्यपि गायीच्या दुधापेक्षा म्हशीचे दूध अधिक निघते आणि बैलाच्या तुलनेत रेडे कमी लाभा देतात. तरीही गायीच्या दुधाने व बैलाच्या उपयोगाने, मनुष्याला जितका सुखाचा लाभ होतो, तितका म्हशीच्या दूध व रेड्यापासून होत नाही. कारण की जितके आरोग्यकारक व बुद्धिवर्धक इत्यादी गुण गायीच्या दुधात असून जे लाभ बैलामुळे होतात तितके म्हशीच्या दुधात व रेड्यामध्ये होऊ शकत नाहीत. यासाठी आर्यांनी गाय सर्वोत्तम मानली जाते.

उंटीणीच्या दुधाचे प्रमाण गाय व म्हशीच्या दुधापेक्षा अधिक असते, पण ते गायीच्या दुधासारखे नाही. उंट व उंटिणीचे गुण ओझे उचलून त्वरित

पोहचविण्यासाठी प्रशंसनीय आहेत.

एक बकरी कमीत कमी, एक व जास्तीत जास्त पाचशेर दुध देते, सरासरीने प्रत्येक बकरीपासून तीन शेर दूध मिळते आणि ती किमान तीन व कमाल पाच महिने दुध देते. तर त्याची सरासरी चार महिने होते. ती एका महिन्यात सव्वा दोन मण व चार महिन्यात नऊ मण दूध देते.

पूर्वोक्त सुत्रानुसार या दुधापासून १८० (एकशे ऐंशी) माणसे तृप्त होतात. एक बकरी वर्षात दोनता व्याते, या हिशेबाने एका वर्षात, एका बकरीच्या दुधाने ३६० व्यक्ती, एका वेळेस जेवण करून तृप्त होतात. कोणतीही बकरी किमान चार व कमाल आठ वर्षे विते, याची सरासरी सहा वर्षे होते, तर तिच्या जन्म भराच्या दुधाने २१६० (दोन हजार एकशे साठ) माणसांचे एक वेळेच्या भोजनाने पालन पोषण होते.

आता बकरीची पिले सरासरीने २४ झाली असे समजू कारण किमान एक व कमाल तीन पिलांना ती जन्म देते. त्यातून दोनचा अल्प मृत्यु झाला. तरी २२ (बावीस) राहतात. त्यातून बारा बकऱ्यांच्या दुधापासून २५९२० (पंचवीस हजार नऊशे वीस) माणसांचे एका दिवसाचे पोषण होते. तिच्या पिढ्यान्पिढ्यांचा हिशेब लावला तर असंख्य माणसांचे पालन होऊ शकते आणि बकरेही ओझे उचलण्याच्या कामी उपयोगाला येऊ शकतात आणि बकरा-बकरी, मेंढा-मेंढीच्या लोकरीच्या दुधापेक्षा कमी असते, तरी बकरीच्या दुधापेक्षा तिच्या दुधात बल व घृत अधिक असते. याच प्रकारे अन्य दुध देणाऱ्या पशुंच्या दुधापासून अनेक प्रकारचे लाभ होतात.

जसे उंट, उंटिणीपासून लाभ होतात तसे घोडे, घोड्या आणि हत्ती इत्यादींपासून अधिक कार्यसिद्धी होते. अशाच प्रकारे वराह, कुत्रे, कोंबडे-कोंबड्या आणि मोर इत्यादी पक्ष्यांपासूनही अनेक फायदे होतात. जी माणसे हरीण, सिंह इत्यादी पशू आणि मोरसारख्या पक्ष्यांपासून फायदा करून घेण्याची इच्छा ठेवल्यास, तसे होऊ शकेल व सगळ्यांचे रक्षण उत्तरोत्तर समयानुकूल होईल, सध्या परमोपकारक गायीचे रक्षण करणे महत्त्वाचे आहे.

दोनच प्रकाराने मनुष्य आदिचे प्राणरक्षण, जीवन, सुख, बल, पुरुषार्थ इत्यादीची वृद्धी होते. एक अन्नपान दुसरे आच्छादन, यातून पहिल्याच्या शिवाय मनुष्यादिचा सर्वथा प्रलय आणि दुसऱ्याशिवाय अनेक प्रकारच्या पीडा

होतात.

पाहा! ते पशू गवत, तृण, पाने, फळे, फुले इत्यादी खातात आणि दुध आदि अमृतरुपी रत्न देतात तसेच नांगर, गाडी ओढून, अनेक विध अन्नादि उत्पन्न करून सगळ्यांच्या बुद्धी, बळ, पराक्रमाला वाढवून निरोगी करतात. पुत्र, पुत्री आणि मित्रादीच्या सारखे माणसांवर विश्वास ठेवतात आणि प्रेम करतात. जिथे बांधले तेथे बांधून राहतात, जिकडे चालवा तिकडे चालतात, जेथून हटवा तेथून हटतात, पाहिले आणि बोलावले तर जवळ येतात, जेव्हा कधी वाघासारखे पशू अथवा मारणाऱ्यांना पाहून, आपले रक्षण व पालनपोषण करणाऱ्याच्या जवळ पळत येतात की, हा आमचे रक्षण करील, ज्यांच्या मृत्युनंतर त्यांची कातडी सुद्धा काटे इत्यादी पासून रक्षण करते, जंगलात चरून आपल्या बाळांना व मालकांकरिता दूध देण्याला निश्चित स्थानी, निश्चित वेळी चालत येतात, आपल्या स्वामीच्या रक्षणासाठी तन, मन लावतो, ज्यांचे सर्वस्व राजा आणि प्रजा आधि मनुष्याच्या सुखाकरिता आहे, अशा शुभ गुण युक्त, सुखकारक, पशूंच्या गळ्यावर सुरी ठेवून कापतात, अशी माणसे आपले पोट भरून, जगाची हानी करतात. जगात त्यांच्यापेक्षा अधिक विश्वासघातकी, कृतघ्न, दु:ख देणारी आणखी पापी माणसे असतील काय?

याचसाठी यर्जुवेदाच्या प्रथम मंत्रात परमात्म्याची आज्ञा आहे की– '**अघ्न्या: यजमानस्य पशून् पाहि**' हे मनुष्या! तू या पशुंना कधीही मारू नकोस आणि यजमान अर्थात सगळ्यांना सुख देणाऱ्या पशुंचे रक्षण कर, ज्यामुळे तुझेही रक्षण होईल आणि यामुळे ब्रह्मापासून ते आजपर्यंतचे आर्य लोक, पशूंच्या हिंसेला पाप व अधर्म समजत होते आणि आजही समजतात.

आणि यांच्या रक्षणापासून, अन्नही महाग होत नाही. कारण की, दुध आदिचे आधिक्य झाले की, गरिबांनाही खायला प्यायला मिळेल व अन्न खायला कमी लागेल आणि अन्न कमी खाण्याने मलही कमी होतो. मल कमी होण्याने दुर्गंधही कमी होतो. दुर्गंध कमी झाल्याने वायू व जलवृष्टीची अशुद्धी कमी होते. त्यामुळे रोग कमी होऊन सर्वांचे सुख वाढते.

तात्पर्य गाय आणि पशूंचा नाश झाला की, राजा व प्रजेचाही नाश होतो, कारण जेव्हा पशू कमी होतात. तेव्हा दूध आदि पदार्थ आणि शेती आदि कामात घट सुरु होते. पहा, म्हणूनच जितक्या किंमतीला जितके दूध,

तूप आदि पदार्थ तसेच बैल आदि पशू ७०० (सातशे) वर्षांपूर्वी मिळत होते, तितके दूध, बैल आदि पशू. आज दहापट किमतीतही मिळत नाही. कारण या ७०० (सातशे) वर्षात गाय आदि पशूंना मारणारी मांसाहारी विदेशी माणसे बहु:संख्य येऊन स्थायिक झालेली आहेत. ते या परोपकारी, सर्वोपकाही, पशुंचे हाड, मांस सुद्धा सोडत नाहीत. म्हणून **'नष्टे मूले नैव पत्रं न पुष्पम्'** (वृद्ध चाणक्य नीति १०/१३) कारणच जर नष्ट केले तर कार्य का नष्ट होणार नाही?

हे मांसाहाऱ्यांनो! तुम्हा लोकांना जेव्हा काही काळानंतर पशू मिळणार नाहीत, तेव्हा माणसांचे मांस खाणार का? तेही सोडणार नाही. हे परमेश्वरा! तू या पशूंवर जे की विना अपराध मारले जात आहेत, दया का करीत नाहीस? तुझे त्यांच्यावर प्रेम नाही का? त्यांच्यासाठी लक्ष का देत नाहीस आणि त्यांचा चित्कार का ऐकत नाहीस? या मांसाहारीच्या आत्म्यात दया, प्रकाश करून निष्ठुरता, कठोरता, स्वार्थीपणा आणि मूर्खता आदि दोषांना का दूर करीत नाहीस? ज्यामुळे ते कुकर्मातून वाचतील!

***

# अथ समीक्षां हिंसक – रक्षक संवादः
## (हिंसक आणि रक्षकाचा परस्पर संवाद)

**हिंसक :** ईश्वराने सर्व पशू इत्यादी सृष्टी माणसांसाठी रचली आहे आणि माणसांची रचना स्वतःची भक्ती करता यावी म्हणून त्यासाठी मांस खाण्यात दोष असू शकत नाही.

**रक्षक :** भाऊ ! ऐका, तुमचे शरीर ज्या ईश्वराने बनविले आहे, काय त्यानेच पशू आदि प्राण्यांचे शरीर बनवलिे नाही का? जर तुम्ही म्हणाल की, पशू इत्यादी आम्हाला खाण्यासाठी बनविले आहेत, तर आम्ही म्हणतो की, हिंसक पशूसाठी तुम्हाला बनविले आहे कारण की, जसे तुमचे मन त्यांचा मांसावर जाते, तसेच सिंह, गिधाड इत्यादीचे मन तुमचे मांस खाण्यावर जाते तर त्यांच्यासाठी तुम्ही का नाही?

**हिंसक :** पाहा, ईश्वराने मनुष्याचे दात तीक्ष्ण मांसाहारी पशू सारखे बनवलिे आहेत, यामुळे आम्ही जाणतो की, मनुष्याला मांस खाणे उचित आहे.

**रक्षक :** ज्या वाघादी पशूंच्या दातांचा दृष्टांत देऊन आपला पक्ष सिद्ध करू इच्छिता, तेव्हा तुम्ही सुद्धा त्यांच्यासारखेच आहात काय? पाहा तुमची मानव जात व त्यांची पशु जात. तुमचे दोन पाय, त्यांचे चार, तुम्ही विद्या शिकून सत्य असत्याचा, विवेक करू शकता, अन् ते करू शकत नाहीत. तुमचा दृष्टांतही योग्य नाही कारण की, जर दाताचाच दृष्टांत घेता तर मग वानराच्या दाताचा का नाही घेत? पाहा वानराचे दात, सिंह आणि मांजरासारखे आहेत, आणि ते मांस कधीही खात नाहीत. मनुष्य आणि वानराची आकृती ही बरीच मिळती-जुळती आहे. जसे मनुष्याला हात, पाय, नख इत्यादी असतात तसेच वानरालाही असतात. याकरिता परमेश्वराने मनुष्याला दृष्टांताने उपदेश केला आहे की जशी वानरे मांस कधीही खात नाहीत आणि फळादि खाऊन निर्वाह करतात तसेच तुम्हीही करा. जसा वानरांचा दृष्टांत मनुष्यांशी तंतोतंत जुळतो तसा दुसऱ्या कुणाचाही नाही. त्यासाठी

मनुष्याला अति उचित आहे की, मांस खाणे सर्वथा सोडून द्यावे.

**हिंसक :** जे पशू आणि मनुष्य मांसाहारी आहेत ते बलवान असतात आणि जे मांस खात नाहीत ते निर्बल असतात, म्हणून मांस खायला पाहिजे.

**रक्षक :** या अल्प बुद्धीच्या गोष्टी आहेत, तुम्ही थोडाही विचार का करीत नाही. पाहा सिंह मांस खातो आणि डुक्कर अथवा रानरेडा मांस कधीही खात नाही, परंतु सिंहाने अनेक मनुष्याच्या समुदायावर हल्ला केला तर एक किंवा दोन व्यक्तींना तो मारतो आणि एक दोन बंदुकीच्या गोळ्या अथवा तलवारीच्या प्रहाराने मरूनही जातो आणि जेव्हा रानडुक्कर अथवा जंगली रेडा ज्या प्राणी समुदायावर तुटून पडतो तेव्हा तो अनेक (घोडे) स्वारांना व माणसांना मारतो आणि अनेक गोळ्या, भाले तसेच तलवार इत्यादीच्या प्रहाराने लवकर मरत नाही, सिंह त्याला भिऊन दूर पळून जातो आणि ते सिंहाला भीत नाहीत.

जर प्रत्यक्ष दृष्टांत पाहिजे असल्यास एक मांसाहारी व्यक्ती व दुसरा मथुरेतील दुध, तूप अन्नाहारी मल्ल चौबा यांच्यात बाहू युद्ध झाल्यास, अनुमान आहे की, मांसाहाऱ्याला खाली पाडून, त्याच्या छातीवर चौबा चढून बसेल यावरून परीक्षा होऊल की, काय काय खाण्याने बळ कमी अथवा अधिक होते.

बरे, थोडा विचार करा की, टरफले खाल्ल्याने अधिक बळ मिळते की रस व सार खाण्याने. मांस टरफलासारखे व दूध-तूप हे सार व रसाप्रमाणे आहे. याला जो कोणी युक्तिपूर्वक खाईल तर मांसापेक्षा अधिक बल व गुण देणारे ठरेल. म्हणून मांस खाणे व्यर्थ, हानिकारक, अन्याय, अधर्म आणि दुष्टकर्म नाही का?

**हिंसक :** ज्या देशात मांसाशिवाय दुसरे काही मिळत नाही तेथे अथवा आपत्कालात अथवा रोगनिवृत्तीसाठी मांस खाण्यात दोष होत नाही.

**रक्षक :** हे आपले म्हणणे व्यर्थ आहे. कारण जेथे मनुष्य राहतो, तेथे जमीन अवश्य असते. जेथे पृथ्वी आहे तेथे शेती, फळे, फुले इत्यादी होतातच आणि जेथे काहीच होऊ शकत नाही, तेथे मनुष्यही राहू शकत नाही. जेथे ओसाड जमीन आहे, तेथे गोड पाणी आणि फुले, फळे आदि नसल्याने तेथे मनुष्य राहणे अवघड आहे. आपत्काळातही

अन्य उपायाने निर्वाह होऊ शकतो, जसे शाकाहारी करतात. मांसाशिवाय रोगांचे निवारण औषधीने यथावत होते, म्हणून मांस खाणे चांगले नाही.

**हिंसक :** जर कुणीही मांस खाल्ले नाही तर पशूइतके वाढतील की पृथ्वीवर सामावणार नाहीत आणि यासाठी ईश्वराने त्यांची उत्पत्तीही जास्त केली आहे. मग मांस का खाऊ नये?

**रक्षक :** वा! वा!! वा!!! तुमच्या बुद्धीचा विपर्यास मांसाहारानेच झाला असेल. पाहा, मनुष्याचे मांस कुणीही खात नाही. मग ते का वाढले नाहीत? आणि पशूंची अधिक उत्पत्ती यासाठी आहे की एका मनुष्याच्या पालनपोषणासाठी अनेक पशुंची गरज आहे. म्हणून ईश्वराने त्यांना अधिक उत्पन्न केले आहे.

**हिंसक :** ही जितकी उत्तरे दिली, ती सर्व व्यवहारासंबंधी आहेत आणि पशुंना मारून खाल्ल्याने अधर्म तर होत नाही आणि जर होत असेल तर तुम्हाला होईल कारण तुमच्या मताने ते निषिद्ध आहे म्हणून तुम्ही मांस खाऊ नका, आम्ही खातो. कारण की आमच्या मते मांस खाणे अधर्म नाही.

**रक्षक :** आम्ही तुम्हाला विचारतो की, धर्म आणि अधर्म व्यवहारातच होतो की अन्यत्र? तुम्ही केव्हाही हे सिद्ध करू शकणार नाही की व्यवहारामध्ये भिन्न धर्माधर्म असतात. ज्या ज्या व्यवहाराने दुसऱ्यांची हानी होईल तो तो अधर्म आणि ज्या ज्या व्यवहाराने उपकार होतील तो तो धर्म म्हटला जातो. तर लाखोंना सुख लाभ देणाऱ्या पशुंचा नाश करणे अधर्म आणि त्यांच्या रक्षणापासून लाखोंना सुख देणे याला तुम्ही धर्म मानीत नाहीत का? पाहा, चोरी व्यभिचारादि कर्म यासाठी अधर्म आहेत की, त्यामुळे दुसऱ्यांची हानी होते नाहीतर जी जी प्रयोजने धनादिने त्यांचे मालक सिद्ध करतात तेच प्रयोजन त्या चोर वगैरे लोकांचीही सिद्ध होतात. याकरिता हे निश्चित आहे की, जे जे कर्म जगात हानिकारक आहे ते अधर्म आणि जे जे परोपकारक आहे तो 'धर्म' आहे.

जेव्हा एखाद्या मनुष्याचे नुकसान करण्याने, चोरी इत्यादि पापकर्म

म्हटले जाते, तर गाय इत्यादि पशूंना मारण्याने, अनेकांचे नुकसान करून महापाप होत नाही का? पाहा, मांसाहारी मनुष्यात दया वगैरे उत्तम गुण असतच नाहीत, परंतु स्वार्थवश दुसऱ्यांची हानी करून, आपले प्रयोजन सिद्ध करण्यातच ते नेहमी गुंतलेले असतात.

जेव्हा मांसाहारी एखाद्या पुष्ट पशुंना पाहतो, तेव्हा त्याला इच्छा होते की, याच्यात मांस भरपूर आहे, याला मारून खाल्ल्यास काय छान होईल, जेव्हा मांस न खाणारा त्याला पाहतो तेव्हा तो पशू आनंदात आहे हे पाहून, तो प्रसन्न होतो. जसे सिंहासारखे मांसाहारी पशु, कोणावर उपकार तर करीत नाहीतच, परंतु आपल्या स्वार्थासाठी, दुसऱ्याचे प्राण घेऊन, मांस खाऊन अति प्रसन्न होतात. ते मांसाहारी माणसेही असतात. यासाठी कोणत्याही मनुष्याने मांस खाणे उचित नाही.

**हिंसक :** बरे, जर हीच गोष्ट असेल तर, जोपर्यंत पशू कामाला येतात तोपर्यंत त्यांचे मांस खाऊ नये, पण जेव्हा म्हातारे होतात अथवा मरतात, तर त्यांचे मांस खाण्यात काहीही दोष नाही.

**रक्षक :** आपल्यावर उपकार करणारे माता, पिता इत्यादींना वृद्धावस्थेत मारणे जसा दोष आहे तसाच दोष त्या पशूंची सेवा न करता, मारून त्यांचे मांस खाण्यात ही आहे आणि मेल्यावर त्यांचे मांस खाल्ल्याने तर त्याचा स्वभाव मांसाहारी झाल्याने निश्चितच हिंसक होऊन, हिंसारूपी पापापासून केव्हाही तो वाचू शकणार नाही. यासाठी कोणत्याही अवस्थेत मांस खाऊ नये.

**हिंसक :** जे पशू पक्षी जंगलात राहतात, त्यांच्याकडून कोणावरही उपकार होत नाही. पण हानी होते त्यांचे मांस खावे की नाही?

**रक्षक :** खाऊ नये कारण की ते उपकारक पशू असू शकतात. पाहा १०० (शंभर) भंगी जेवढी शुद्धी करतात, त्यापेक्षा किती तरी अधिक शुद्धी एक वराह, कोंबडा किंवा मोरासारखा पक्षी सापासारख्यांना नष्ट करून, मोठे उपकार करतात. जसा मनुष्याचा आहार असतो तसा न घेता, अन्य घेतला तर ते अनुपकारक आहे. पण तेच जंगली मांसाहारी पशू पक्षी यांचा आहार, जंगली पशू आणि पक्षी आहेत. जर कुणी विद्या

वा युक्तीने सिंह इत्यादी वनस्थ पशू आणि पक्षी यांच्यापासून उपकार करवून घेतले तर अनेक प्रकारचे लाभ, त्यांच्यापासूनही होऊ शकतात. यासाठी मांसाहाराचा सर्वत्र सर्वथा निषेध व्हायला पाहिजे.

बरे, ज्यांचे दुध खाण्या-पिण्यात येते, ते माता-पित्यासारखे माननीय का होऊ नयेत? ईश्वराच्या सृष्टीकडे पाहिल्यानंतर कळते की, मनुष्यापेक्षा पशू-पक्षी जास्त असणे कल्याणकारक आहे. कारण की, ईश्वराने मनुष्याच्या खाण्यापिण्याच्या पदार्थापेक्षा, पशु-पक्ष्यांच्या खाण्यापिण्याचे पदार्थ, गवत, वृक्ष, फुले, फळे अधिक निर्माण केलेली आहेत आणि ते न पेरता, न पाणी देता, पृथ्वीवर स्वत:च उत्पन्न होतात आणि तेथे पाऊसही पडतो. यासाठी समजा की, ईश्वराचा अभिप्राय त्यांना मारण्यात नाही तर रक्षणात आहे.

**हिंसक :** जो मनुष्य पशू मारून खातो, त्याला पाप लागते आणि जर मांस विक घेऊन अथवा भैरव, चामुंडा, दुर्गा, जखैया अथवा वाममार्गी आणि यज्ञ वगैरे रीतीने चढवून समर्पण करून खाल्ले तर पाप लागता कामा नये. कारण ते विधी करून खातात.

**रक्षक :** कोणीही मांस खाऊ नये, मांसाहाराचा उपदेश, किंवा अनुमती पण देऊ नये, म्हणजे पशूंना कधीही मारले जाणार नाही. कारण की, या व्यवहारात दिशाभूल, लाभ व विक्री होऊ नये, तरच प्राण्यांना मारणे बंद होऊन जाईल. या संबंधी हे प्रमाण आहे.

**'अनुमंता विशसिहा निहन्ता क्रयविक्रयी ।**
**संस्कर्ता चोपहर्ताय खादकश्चेति घातका: ।।'**

**-मनु.अ. ५/ श्लोक ५१**

**अर्थ-** अनुमति - मारण्याचा सल्ला, आज्ञा देणे, मांस कापणे पशू इत्यादि मारणे, मारण्यासाठी घेणे व विकणे, मांस शिजविणे, वाढणे आणि खाणारे हे आठ प्रकारचे मनुष्यघातक हिंसक अर्थात पापी आहेत.

आणि भैरव इत्यादीच्या निमित्ताने पण मांस खाणे, मारणे व मारायला लावणे, महापाप आहे यासाठी दयाळू परमेश्वराने वेदात कोठेही मांस खाणे अथवा पशू आदि मारण्याची विधी लिहिला नाही.

# मद्यपानाचा निषेध

मद्यही मांस खाण्याचे एक कारण आहे, म्हणून येथे थोडक्यात त्या संबंधी लिहीत आहे.

**प्रमत्त :** सांगा ! मांस खाणे सुटले ते सुटले परंतु मद्य पिण्यात तर काही दोष नाही ना?

**शांत :** मद्य पिण्यातही तेच दोष आहेत, जे मांस खाण्यात आहेत. मद्याच्या नशेमुळे मनुष्याची बुद्धी नष्ट होऊन, तो अकर्तव्य करतो आणि कर्तव्याला सोडून देतो, न्यायाला अन्याय व अन्यायाला न्याय समजून असे विपरीत कर्म करतो मद्याची उत्पत्ती विकृत पदार्थापासून होते म्हणून तो मांसाहारी अवश्य होतो व मद्यपानाने आत्म्यात ही विकार उत्पन्न होतात.

जो मद्य पितो तो विद्यादि गुणांपासून वंचित होऊन त्या दोषात फसून, आपले धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष फळांना सोडून पशुवत आहार, निद्रा, भय, मैथून आदि कामात प्रवृत्त होऊन आपल्या मनुष्य जन्माला व्यर्थ घालवतो. यासाठी नशा अर्थात मद्यकारक द्रव्यांचे सेवन कधीही करू नये.

जसे मद्य आहे तसेच भांग इत्यादी पदार्थही मादक आहेत. यासाठी त्यांचे सेवन कधीही करू नये. कारण हे ही बुद्धीचा नाश करून प्रमाद, आळस आणि हिंसादी मध्ये मनुष्याला ओढतात. म्हणून मद्यपानासारखाच यांचाही सर्वथा निषेधच आहे.

यासाठी, हे धार्मिक सज्जन लोकांनो ! तुम्ही या पशुंचे रक्षण तन, मन, धनाने का करीत नाही? हाय !! ही दु:खाची गोष्ट आहे की, हिंसक लोक जेव्हा गाय, बकरी इत्यादी पशू आणि मोर इत्यादी पक्ष्यांना मारायला घेऊन जातात तेव्हा ते अनाथ तुम्हा आम्हाला पाहून राजा व प्रजेविरुद्ध शोक प्रकट करतात.

''पाहा! आम्हाला अपराधाशिवाय हाल-हाल करून मारतात.आणि आम्ही रक्षण करणारे आणि मारणाऱ्यांनाही दूध व अमृतासारखे पदार्थ देण्यासाठी जिवत राहू इच्छितो आणि मरू इच्छित नाही. पाहा! आमचे सर्वस्व

परोपकारासाठी आहे आणि आम्ही यासाठी हंबरडा फोडतो की, आम्हाला तुम्ही वाचवावे. आम्ही तुमच्या भाषेत आमचे दु:ख सांगू शकत नाही, आणि तुम्हाला आमची भाषा कळत नाही. नाहीतर आमच्यापैकी कुणाला, कोणी, मारलं असत का? तर आम्हीही तुमच्या लोकांसारखे. मारणाऱ्यांना न्यायव्यवस्थेकडून फाशी देवविली नसती का? आम्ही आता अती दु:खी आहोत. कारण कुणीही आम्हाला वाचवायला तयार नाही आणि जर कुणी वाचवू इच्छित असेल तर, त्याचा मांसाहारी लोक द्वेष करतात.''

असो ते तर स्वार्थासाठी द्वेष करीत असतील, कारण 'स्वार्थी दोष नं पश्यति' जे स्वार्थ साधण्यात तत्पर असतात ते आपल्या दोषांकडे लक्ष देत नाहीत. परंतु दुसऱ्यांची हानी झाली तरी मला सुख मिळायला हवे परंतु जे उपकारी आहेत त्यांनी यांना वाचविण्यासाठी भगीरथ प्रयत्न करावेत. जसे आर्य लोक सृष्टीच्या आरंभापासून आजपर्यंत, वेदोक्त रितीने प्रशंसनीय कर्म करीत आले आहेत. तसे सर्व जगातील लोकांनी करणे, आवश्यक आहे.

धन्य आहेत आर्यावर्त्त देशवासी लोक, जे ईश्वराच्या सृष्टीक्रमानुसार परोपकारात, तन, मन, धन अर्पण करीत होते व करीत आहेत. आर्यावर्त्तीय राजा, महाराजा, प्रधान व धनाढ्य लोक अर्ध्या पृथ्वीवर जंगल ठेवीत असत. ज्यामुळे पशु आणि पक्ष्यांचे रक्षण होऊन, औषधी, दूध इत्यादी पवित्र पदार्थ उत्पन्न व्हावेत. ज्यांच्या खाण्या-पिण्याने आरोग्य, बुद्धिबल, पराक्रम इत्यादी वृद्धिगंत होत असे. वृक्ष अधिक झाल्याने वृष्टि व हवेतील आर्द्रतेची शुद्धी अधिक होते. पशू व पक्षी जास्त झाल्याने खतही अधिक होते.

परंतु आजच्या काळातील लोकांचा याच्या विपरीत व्यवहार आहे, जंगल कापायला लावणे व पशूंना मारणे अथवा मारायला लावून खाणे आणि विष्टा आदिचे खत शेतात टाकून व टाकायला लावून रोगांची वृद्धी करून, जगाचे अहित करणे, स्वार्ध साधणे व परमार्थाक़डे लक्ष न देणे, इत्यादी उलटी कामे आहेत.

'विषादप्यमृतं ग्राह्यम्' सत्पुरुषांचा हाच सिद्धांत आहे की, विषातुनही अमृत घ्यावे. अशा प्रकारे गाय इत्यादिंचे मांस विषवत महारोगकारी म्हणून सोडून द्यावे आणि त्यापासून उत्पन्न झालेले दुधासारखे पदार्थ, अमृत रोगनाशक आहेत, ते घ्यावेत. यासाठी यांचे रक्षण करून सर्वांनी विषत्याग करून अमृत

सेवन करणारे व्हावे.

ऐका बंधूनो! तुमचे तन, मन, धन गायीसारख्या प्राण्यांच्या रक्षणासाठी परोपकारात न लागले तर ते काय कामाचे आहे? पाहा, परमेश्वराचा स्वभाव असा आहे की, ज्याने सर्व विश्व आणि सर्व पदार्थ परोपकारासाठीच रचलेले आहेत. तसेच तुमचे तन, मन, धन परोपकारासाठीच अर्पण करा.

महा आश्चर्याची गोष्ट आहे की पशूंना त्रास होऊ नये म्हणून न्यायपुस्तकात व्यवस्थाही लिहिलेली आहे, की जर पशू दुर्बल आणि रोगी असेल तर त्याला कष्ट देऊ नये आणि जेवढे ओझे सुखपूर्वक उचलू शकेल, तेवढेच त्याच्यावर लादावे. श्रीमती राजराजेश्वरी श्री व्हिक्टोरिया महाराणीचे विज्ञापनही प्रसिद्ध आहे की मूक पशूंना जे जे दुःख दिले जाते ते ते देऊ नये. जर हीच गोष्ट असेल की, पशूंना दुःख देऊ नये, तर त्यांना मारून टाकण्यापेक्षा अधिक कोणते दुःख आहे? फाशीपेक्षा जास्त दुःख बंदीगृहात होते काय? जर कुण्या अपराध्याला विचारले की, ''तुला फाशी दिली तर आनंद होईल की तुरुंगात ठेवल्याने?'' तो स्पष्टपणे सांगेल की फाशी देण्यापेक्षा कैदेत राहण्यात त्याला समाधान मिळेल.

आणि जर कोणी मनुष्य भोजन करायला बसला असेल तर त्याच्यासमोरील भोजनाचे पदार्थ उचलून घेतले आणि त्याला तेथून दूर केले तर तो आनंदी होईल काय? असेच आजकालच्या जगात, गायीसारखे पशू सरकारी जंगलात जाऊन गवत आणि पाने, जे की त्यांच्याच भोजनासाठी, विना महसूल देता खाल्ले अथवा खायला गेले, तर त्या बिचाऱ्या पशूंची आणि त्यांच्या मालकांची दुर्दशा होते. जंगलात आग लागली तर काही हरकत नाही. पण ते पशूंनी खायला नकोत, असे का? आम्ही म्हणतो की, कोणत्याही अतिक्षुधातूर राजा अथवा राजपुरूषासमोर आलेला भात इत्यादी अथवा डबल रोटी हिसकावून घेऊन, त्याला खाऊ न देता त्याची दुर्दशा केली तर जशी दुःखाची जाणीव त्यांना होईल तशीच त्या पशू-पक्षी आणि त्यांच्या मालकांना होत नसेल का?

लक्ष देऊन ऐका की, जसे सुख दुःख आपल्याला होते तसेच इतरांनाही होते, हे समजून घ्या आणि हे ही लक्ष्यात असू द्या की, ते पशू इत्यादी आणि त्यांचे मालक तसेच कृषी आदि काम करणारी प्रजा व

माणसांच्या अधिक पुरुषार्थ करण्यानेच राजाचे ऐश्वर्य अधिक वाढते आणि (प्रजा व पशूंनी) काम कमी केल्याने ते नष्ट होते. म्हणूनच राजा प्रजेकडून कर घेतो कारण की त्यांचे रक्षण यथायोग्य करावे, यासाठी नव्हे की राजा व प्रजेच्या सुखाचे कारण गाय आदि पशूंचा नाश करून टाकावा.

यासाठी आज पर्यंत जे झाले ते झाले आत पुढे पूर्ण विचार करून, सगळ्यांना हानिकारक असे काम करू नये अथवा करू देऊ नये. आम्हा लोकांचे हे काम आहे की तुम्हाला चांगले व वाईट काम कोणते ते समजावून द्यावे आणि तुमचेही हे काम आहे की भेदभाव सोडून सगळ्यांचे रक्षण व प्रगती करण्यास तत्पर रहावे.

सर्वशक्तिमान जगदीश्वर आपल्या सर्वांवर पूर्ण कृपा करो. ज्यामुळे आपण सगळे लोक जगातील हानिकारक कामांना सोडून देऊन, सर्वोपकारक कर्मांना करीत, सगळे लोक आनंदात राहोत. या सगळ्या गोष्टींना ऐकून सोडून देऊ नका, नेहमी स्मरणात राहू द्या. या अनाथ पशूंच्या प्राणांना शीघ्र वाचवा. हे महाराजाधिराज जगदीश्वरा ! जर यांना कुणी वाचवित नसेल तर तुम्ही त्यांचे रक्षण करा आणि आमच्याकडून (रक्षण) करवून घेण्यासाठी शीघ्र प्रवृत्त व्हा.

।। इति समीक्षा – प्रकरणम् ।।

***

## २) सभेचे नियम

१) सर्व विश्वाला विविध सुख पोहचविणे, या सभेचा मुख्य उद्देश आहे. कुणाचीही हानी करणे हे प्रयोजन नाही.

२) जे जे पदार्थ सृष्टिक्रमानुसार, ज्या ज्या प्रकाराने अधिक उपकारक व्हावेत, त्या त्या पासून आप्ताभिप्रायानुसार यथायोग्य सर्वहित सिद्ध करणे, या सभेचा परम पुरुषार्थ आहे.

३) ज्या कर्माने अधिक हानी आणि थोडा लाभ होईल, त्याला सभा कर्तव्य समजत नाही.

४) जो जो मनुष्य या परमहितकारी कार्यात तन, मन, धनाने प्रयत्न व सहाय्यता करेल. तो तो या सभेत प्रतिष्टेस पात्र होईल.

५) कारण याचे हे कार्य सर्वहितकारी आहे यासाठी ही सभा पृथ्वीतलावरील मनुष्य जातीच्या सहाय्यतेची पूर्ण अपेक्षा ठेवते.

६) ज्या ज्या संघटना देश-देशांतर आणि द्वीप-द्वीपांतरांत परोपकार करण्याचे अभीष्ट ठेवतात, त्या त्या संघटना या सभेच्या सहायकारिणी समजल्या जातील.

७) जे जे लोक राजनीती अथवा प्रजेच्या अभीष्टाच्या विरुद्ध, स्वार्थी, क्रोधी आणि अविद्यादि दोषांनी प्रमत्त होऊन, राजा आणि प्रजेकरिता अनिष्ट कर्म करतात, ते ते या सभेच्या संबंधीत नाहीत असे समजले जील.

## ३) उपनियम

१) या सभेचे नाव 'गोकृष्यादिरक्षिणी' आहे.

२) या सभेचे उद्देश्य तेच आहेत, ज्यांचे याच्या नियमात वर्णन केलेले आहे.

३) जे लोक या सभेत नाव नोंदवू इच्छितात या सभेत नाव समाविष्ट होण्यासाठी, मंत्र्याकडे असे आवेदन पत्र पाठविले पाहिजे की -
''मी प्रयत्नपूर्वक या सभेच्या उद्देशानुकूल, जे नियमात वर्णन केलेले आहेत, आचरणात आणण्याचे मान्य करतो. माझे नाव या सभेत

समाविष्ट करावे. परंतु कार्यकारिणीला अधिकार असेल की काही विशिष्ट हेतूने, त्याचे नाव या सभेत लिहिण्यास स्वीकृती न देणे. याच्या उद्देशानुसार आचरण करू इच्छितात, ते या सभेत प्रविष्ट होऊ शकतील. परंतु त्यांचे वय १८ वर्षे पूर्ण झालेले असावे. जे लोक या सभेत प्रविष्ट होतील ते 'गोरक्षक सभासद' म्हणून संबोधले जातील.''

४) ज्याचे नाव या सभेत सदाचाराने १ वर्ष राहिलेले असेल व ज्यांनी उत्पन्नाचा शतांश किंवा अधिक, मासिक व वार्षिक या सभेला दिल्यास तो 'गोरक्षक सभासद' होईल आणि सम्मती देण्याचा अधिकार केवळ गोरक्षक सभासदांना राहील.

(अ) गोरक्षक सभासद होण्यासाठी गोकृष्यादि रक्षिणी सभेत वर्षभर नाव राहण्याचा नियम काही व्यक्ती विशेषसाठी, कार्यकारिणी हा नियम शिथिल करू शकेल. या सभेत वर्षभर राहून गोरक्षक सभासद होण्याचा नियम, गोकृष्यादिरक्षिणी सभेच्या दुसऱ्या वर्षापासून अंमलात येईल.

(ब) राजा, सरदार अथवा श्रीमंत सावकार इत्यादिंनी या संस्थेचे सभासद होण्यासाठी, आर्थिक उत्पन्नाच्या शतांश देणे आवश्यक नाही, ते एकाच वेळेस अथवा मासिक, वार्षिक त्यांच्या उत्साह किंवा सामर्थ्यानुसार देऊ शकतात.

(स) कार्यकारिणी काही विशेष हेतूने वर्गणी न देणाऱ्या व्यक्तीसही 'गोरक्षक सभासद' बनवू शकेल.

(द) खालील लिहिलेल्या विशेष परिस्थितीत, त्या सभासदाकडूनही जे गोरक्षक सभासद झाले नसतील, सम्मती घेतली जाऊ शकेल.

(१) जेव्हा नियमात कमी अधिक परिवर्तन करायचे असेल.

(२) जेव्हा की विशिष्ट परिस्थितीत कार्यकारिणी

(३) जो या सभेच्या उद्देशाच्या विरुद्ध काम करेल त्याला गोरक्षक अथवा गोरक्षक सभासद संबोधले जाणार नाही.

(४) गोरक्षक सभासद दोन प्रकारचे असतील. एक साधारण आणि दुसरे माननीय गोरक्षक सभासद जे होतील ते शतांश किंवा १० रु. मासिक

किंवा यापेक्षा अधिक अथवा एकाच वेळेस रु. २५० रु. देतील. अथवा ज्यांना कार्यकारिणी विद्या इत्यादी श्रेष्ठ गुणांनी युक्त असल्याने माननीय समजेल.

(५) ही सभा दोन प्रकारची होईल. एक साधारण सभा, दुसरी कार्यकारिणी.

(६) साधारण सभा तीन प्रकारची होईल. (१) मासिक, (२) षण्मासिक, (३) नैमित्तिक

(७) मासिक सभा - प्रत्येक महिन्यात एक वेळेस होईल, ज्यात महिन्याभरातील जमा-खर्च आणि कार्यकर्त्यांच्या कामाचे वर्णन केले जाईल ते कथन करण्यायोग्य होईल.

(८) षण्मासिक सभा - कार्तिक आणि वैशाखच्या शेवटी व्हावी, ज्यात आप्तोक विचार, मासिक सभेचे कार्य, प्रत्येक प्रकारचा जमा-खर्च समजणे व समजावणे व्हावे.

(९) नैमित्तिक सभा - जेव्हा कधी मंत्री, प्रधान आणि कार्यकारिणीला आवश्यकता वाटेल, तेव्हा ही सभा होईल आणि त्यात विशेष कार्याची व्यवस्था व्हावी.

(१०) कार्यकारिणी सभा - सभेच्या सर्व कार्यव्यवस्थेसाठी, एक कार्यकारिणी नेमली जावी आणि यात तीन प्रकारचे सभासद असावेत. एक प्रतिनिधी, दुसरे प्रतिष्ठित आणि तिसरे अधिकारी.

(११) प्रतिनिधी सभासद - आपल्या समुदायाचे प्रतिनिधी असतील आणि समुदाय त्यांना नेमेल. कोणताही समुदाय आपल्या प्रतिनिधीला जेव्हा वाटेल तेव्हा बदलू शकेल.

प्रतिनिधी सभासदांची ही विशेष कार्ये असतील -

(अ) आपापल्या समुदायाच्या सम्मतीने स्वत:जवळ अद्ययावत माहिती ठेवणे.

(ब) आपापल्या समुदायाच्या कार्यकारिणीचे कार्य, जे प्रकट करण्यायोग्य असेल, ते सांगणे.

(क) आपापल्या समुदायाकडून वर्गणी वसूल करून कोषाध्यक्षाला देणे.

(१२) प्रतिष्ठित सभासद - त्यांच्या विशेष गुणांच्या कारणाने, प्राय: वार्षिक,

नैमित्तिक आणि साधारण सभेत नेमले जावेत. प्रतिष्ठित सभासद कार्यकारिणी सभेत, एक तृतीयांशापेक्षा अधिक नसावेत.

(१३) प्रति वैशाख मासातील सभेत, कार्यकारिणी सभेतील प्रतिष्ठित सभासद आणि अधिकारी, वार्षिक साधारण सभेत पुन्हा नेमले जावेत आणि कोणताही जुना प्रतिष्ठित सभासद व अधिकारी पुन्हा नियुक्त होऊ शकेल.

(१४) जेव्हा वर्षाच्या आत कुणा प्रतिष्ठित सभासद किंवा अधिकाऱ्याचे स्थान रिक्त झाल्यास, कार्यकारिणी स्वत: त्या स्थानावर कुणा आणखी योग्य पुरुषाला नियुक्त करू शकते.

(१५) कार्यकारिणी कामाच्या व्यवस्थेसाठी योग्य व्यवस्था करू शकते पण ती नियम व उपनियमाच्या विरुद्ध असू नये.

(१६) कार्यकारिणी काही विशेष कार्य करण्यासाठी आणि विचार करण्यासाठी, आपल्यातून सभासद व विशेष गुण ठेवणाऱ्या सभासदांना समाविष्ट करून उपसभा नेमू शकते.

(१७) कार्यकारिणी सभेचा कुणीही सभासद, एक आठवड्यापूर्वी मंत्र्याला विनंती करू शकतो की, विशिष्ट विषयावर सभेत निवेदन केले जावे आणि हा विषय प्रधानाच्या अनुमतीनुसार निवेदन केला जावा. परंतु ज्या विषयाच्या निवेदनासाठी पाच कार्यकारिणी सदस्यांनी सम्मती दिली असेल तर ते निवेदन करणे अनिवार्य राहील.

(१८) कार्यकारिणी सभा दोन आठवड्यानंतर अवश्य व्हावी आणि मंत्री आणि प्रधान अथवा अंतरंग सभेच्या पाच सभासदांनी मंत्र्याला पत्र लिहून विनंती केल्यास कार्यकारिणीची सभा होऊ शकते.

(१९) अधिकारी सहा प्रकारचे असावेत (१) प्रधान (२) उपप्रधान (३) मंत्री (४) उपमंत्री (५) कोषाध्यक्ष (६) पुस्तकाध्यक्ष.

मंत्री व कोषाध्यक्ष, पुस्तकाध्यक्ष आवश्यकता असल्यास, यांचे अधिकार असलेले एकापेक्षा जास्त पुरुषही नेमले जाऊ शकतात आणि जेव्हा कोणत्याही अधिकाऱ्याच्या जागी एकापेक्षा अधिक व्यक्ती नेमलेल्या असल्यास कार्यकारिणी सभेने त्यांच्या कामची वाटणी करून द्यावी.

(२०) प्रधानाची खालील प्रमाणे अधिकार व कर्तव्ये असतील.

(१) प्रधान - कार्यकारिणी सभा इत्यादी सर्व सभांचा सभापती समजला जाईल.

(२) सभेच्या सगळ्या कामांची यथायोग्य व्यवस्था ठेवावी आणि सभेच्या उन्नती आणि रक्षणात नेहमी तत्पर रहावे. तो सभेच्या प्रत्येक कार्यावर लक्ष ठेवील, ते नियमानुसार केले जातात की नाही आणि स्वत:ही नियमाच्या आधीन राहून काम करील.

(३) जर कोणतेही काम कठीण व आवश्यक आहे असे त्याला वाटेल, तर त्याचे यथोचित व्यवस्थापन, तेव्हाच करील आणि ते जर बिघडले तर त्याची जबाबदारी त्याच्यावर राहील.

(४) प्रधान आपल्या प्रधानत्वाच्या कारणाने, कार्यकारिणी सभेने स्थापन केलेल्या सर्व उपसभांचा, सभासद होऊ शकतो.

(२१) उपप्रधान - यांचे कार्य (कर्तव्य) हे आहेत की प्रधान जर अनुपस्थित असेल तर त्याचाा प्रतिनिधी म्हणून हा काम पाहिल, जर दोन अथवा जास्त उपप्रधान असतील तर सभेच्या सम्मतीनुसार, त्यांच्यातून कुणा एकाला, प्रतिनिधी बनवावे. परंतु सभेच्या सर्व कामात, प्रधानाला सहाय्य करणे, हे त्याचे मुख्य काम राहील.

(२२) मंत्री - मंत्र्याचे खालीलप्रमाणे अधिकार व कर्तव्ये राहतील.

(१) कार्यकारिणी सभेच्या आदेशानुसार, सभेकडून सगळ्यांशी पत्र व्यवहार करणे.

(२) सभेचा वृत्तांत लिहिणे, आणि दुसरी सभा होण्याच्या पूर्वी, पूर्व वृत्तांत नोंद वहीत लिहिणे अथवा लिहवून घेणे.

(३) मासिक कार्यकारिणी सभेत, त्या गोरक्षक अथवा गोरक्षक सभासदांचे नाव वाचणे, जे की मागील मासिक सभेनंतर प्रविष्ट झाले अथवा त्यापासून पृथक् झाले.

(४) सामान्यत: नोकरांच्या कामावर नजर ठेवणे आणि सभेचे नियम, उपनियम आणि व्यवस्थेच्या पालनावर लक्ष ठेवणे.

(५) या गोष्टीकडेही लक्ष ठेवावे की, प्रत्येक गोरक्षक सभासद, कोणत्या ना कोणत्या समुदायातून असावा आणि हे ही पाहावे

की प्रत्येक समुदायाने आपल्याकडून कार्यकारिणी सभेत प्रतिनिधित्व केलेले असावे.

(६) प्रथम प्रसिद्ध करून, मान्य पुरुषांना सत्कारपूर्वक बसवावे.

(७) प्रत्येक सभेत ठरलेल्या वेळी येणे व उपस्थित राहणे.

(२३) कोषाध्यक्षाचे अधिकार व कर्तव्ये खालीलप्रमाणे असतील.

(१) सभेचे सगळे उत्पन्न स्वीकारणे, त्याची पावती देणे आणि ते यथोचित ठेवणे.

(२) कुणालाही कार्यकारिणी सभेच्या मान्यतेशिवाय पैसा देऊ नये. परंतु प्रधान व मंत्र्याला त्याच प्रमाणात पैसा द्यावा की, ज्या प्रमाणात कार्यकारिणी सभेने ठरविलेले असेल. अधिक देऊ नये आणि धनाच्या उचित खर्चासाठी त्याच अधिकाऱ्याला जबाबदार ठरवावे. ज्याच्याकडून ते खर्च झाले असेल.

(३) धनाच्या जमा-खर्चाच्या हिशेबाची नोंद ठेवणे आणि प्रतिमास कार्यकारिणी सभेत तपासणी व मान्य करवून घेणे.

(२४) पुस्तकाध्यक्ष - पुस्तकाध्यक्षकाचे अधिकार आणि कार्ये अशी असतील.

(१) पुस्तकालयातील स्थिर व विक्रीसाठी असलेल्या सर्व पुस्तकांची देखरेख, रक्षण करणे आणि पुस्तकालयासंबंधी हिशेबही ठेवणे आणि पुस्तकाच्या देवघेवीचे कामही करावे.

(२५) मिश्रित नियम

सर्व गोरक्षक सभासदांची सम्मती खालील लिहिलेल्या परिस्थितीत घेतली जावी.

(१) कार्यकारिणी सभेचा हा निश्चय असावा की, कोण्या साधारण सभेच्या सिद्धांतावर अवलंबून न राहता, गोरक्षक सभासदांची सम्मती जाणून घ्यावी.

(२) सर्व गोरक्षक सभासदांचा पाचवा अंश अथवा अधिक अंश, या निमित्ताने देण्याचे मंत्र्याला पत्र लिहून कळवावे.

(३) जेव्हा मोठ्या खर्चासंबंधी अथवा व्यवस्थेविषयी नियम अथवा व्यवस्थेसंबंधी कोणताही मुख्य विचार करायचा

असेल अथवा जेव्हा कार्यकारिणी सभा सर्व गोरक्षक सभासदांची सम्मती जाणून घेऊ शकते.

(२६) जेव्हा कोणत्याही सभेत, थोड्या वेळेकरिता कोणी अधिकारी उपस्थित नसेल तर त्या वेळेकरिता त्या स्थानावर कोणत्याही योग्य पुरुषाची नियुक्ती कार्यकारिणी सभा करू शकते.

(२७) जर एखाद्या अधिकाऱ्याच्या जागेवर, वार्षिक सभेत, कोणी पुरुष नेमला न गेल्यास, जोपर्यंत त्याच्या स्थानावर नियुक्ती न होईल, तोपर्यंत तोच अधिकारी आपले काम करीत राहील.

(२८) सर्व सभा व उपसभेचा वृत्तांत लिहिला जावा आणि तो सर्व गोरक्षक सभासद पाहू शकतील.

(२९) सर्व सभांचे कार्य तेव्हाच आरंभ होईल, जेव्हा कमीत कमी एक तृतीयांश सभासद उपस्थित असतील.

(३०) सर्व सभा व उपसभेचे सर्व काम बहुमतानुसार निश्चित केले जावे.

(३१) उत्पन्नातील दशांश 'समुदाय ठेव' म्हणून ठेवला जावा.

(३२) सर्व गोरक्षक व गोरक्षक सभासदांना, या सभेच्या उपयोगी वेदादि विद्या जाणली व इतरांना जाणविली पाहिजे.

(३३) सर्व गोरक्षक व गोरक्षक सभासदांना उचित आहे की, लाभ आणि आनंदाच्या वेळात, सभेच्या उन्नतीसाठी उदारता व प्रेमदृष्टी ठेवावी.

(३४) सर्व गोरक्षक व गोरक्षक सभासदांना उचित आहे की, शोक व दु:खाच्या वेळी, परस्परांची सहाय्यता करावी आणि आनंदोत्सवात निमंत्रणावरून सहाय्यक व्हावे, लहान-मोठे अशी भावना होऊ नये.

(३५) जर कोणी गोरक्षक भाऊ कोणत्याही कारणाने अनाथ झाला, अथवा कुणाची स्त्री विधवा झाली अथवा संतान अनाथ झाले अर्थात त्यांचे जगणे मुश्कील झाले आणि 'गोकृष्यादि-रक्षिणी' सभेने त्यांची निश्चित माहिती जाणली, तर ही सभा त्यांच्या रक्षणासाठी यथाशक्ती यथोचित व्यवस्था करेल.

(३६) जर गोरक्षक सभासदातील कोणांचा आपसात वाद झाला, तर उचित आहे की त्यांनी आपसात मिटवावा अथवा गोरक्षक सभासदाच्या न्याय उपसभेकडून त्याचा निवाडा करवून घ्यावा. परंतु अशक्यावस्थेत

राजनीति (न्यायलया) कडूनही न्याय करवून घ्यावा.

(३७) या गोकृष्यादिरक्षिणी सभेच्या व्यवहारात जितका लाभ होईल तो सर्व हितकारी कामात लावला जावा. परंतु हे महाधन तुच्छ कार्यात खर्च करू नये आणि जर कुणी या गोकृष्यादि रक्षणासाठी जे धन आहे. त्याचे अपहरण करील, त्याला गोहत्येचे पाप लागल्याने, तो या लोकत व परलोकत महादु:ख भागी अवश्य होईल.

(३८) सध्या या सभेच्या धनाचा खर्च, गाय आदि पशू घेणे, त्यांचे पालन करणे, गवत आणि कुरण खरेदी करणे, त्यांच्या रक्षणासाठी नोकर अथवा अधिकारी ठेवणे, तळे, विहीर, आड अथवा वाडा खरेदीसाठी करावा. पुन्हा अत्युन्नत झाल्यावर सर्वहितकारी कार्यात खर्च करावे.

(३९) सगळ्या सज्जनांना उचित आहे की, या गोरक्षक धन इत्यादि वस्तुवर स्वार्थ दृष्टीने हानी करण्याचा मनात कधी विचारही आणू नये. पण यथाशक्ती, या व्यवहाराच्या उन्नतीत तन, मन, धनाने नेहमी परम प्रयत्नच करावेत.

(४०) या सभेच्या सभासदांनी ही गोष्ट अवश्य ओळखली पाहिजे की, जेव्हा गाय आदि पशू रक्षणाने खूप वाढतील, तेव्हा कृषी आदि काम व दूध, तूप इत्यादींची वृद्धी होऊन, सर्व मनुष्यांना विविध सुख लाभ अवश्य होतील. याच्याशिवाय सर्वांचे हित साधणे संभव नाही.

(४१) पहा, पूर्वोक्त रीतीनुसार, एका गायीच्या रक्षणाने, लाखो मनुष्यांना लाभ होतो आणि ज्याच्या मारण्याने तितक्यांचीच हानी होते अशा निकृष्ट कर्म करण्याला आप्त विद्वान कधीही चांगले समजणार नाहीत.

(४२) या सभेचे जे पशू प्रसूत होतील, त्यांचे दूध एक मासपर्यंत त्यांच्या वासरांना पाजवावे आणि अधिक झाले तर त्याच पशूला अन्नासोबत खायला द्यायला पाहिजे आणि दुसऱ्या महिन्यात, तीन स्तनाचे दूध वासराला द्यावे व एक भाग घ्यायला पाहिजे, तिसऱ्या महिन्याच्या सुरुवातीपासून अर्धे दूध घ्यावे व अर्धे वासराला तोपर्यंत द्यावे की जोपर्यंत गाय दूध देईल.

(४३) सभासदांना उचित आहे की, जेव्हा जेव्हा कधी कुणाला स्वरक्षित

पशू दिला, तेव्हा तेव्हा त्याच्याकडून न्याय-नियमपूर्वक व्यवस्थापत्र घ्यावे आणि द्यावे. जेव्हा पशु असमर्थ होईल. त्याच्या कामाचा राहणार नाही आणि त्याच्यात त्याचे पालन करण्याचे सामर्थ्य असणार नाही, तो अन्य दुसऱ्या कुणाला देऊ शकणार नाही. परंतु पुन्हा सभेच्या स्वाधीन करेल.

(४४) या सभेच्या कार्यकारिणी सभेला केवळ उचितच नव्हे तर अत्यावश्यक आहे की, वरील प्रकारच्या अप्राप्त पशुची प्राप्ती, प्राप्त झालेल्यांचे रक्षण, रक्षिताची वृद्धी आणि वाढलेल्या पशुकडून नियमानुसार आणि सृष्टिक्रमानुसार उपकार घ्यावेत. आपल्या अधिकारात नेहमी ठेवावेत. अन्य कुणाला स्वाधिनता कधीही देऊ नये.

(४५) हे फार उपकारी कार्य आहे. यासाठी हे कार्य करणारा इहलोक व परलोकात अर्थात स्वर्गात पूर्ण सुखाला प्राप्त होतो.

(४६) कोणताही मनुष्य, या सभेच्या पूर्वोक्त उद्देशांना पूर्ण केल्याशिवाय सुखाची प्राप्ती करू शकत नाही.

(४७) असाही कुणी मनुष्य या सृष्टीत असेल काय? जो आपल्या सुख दुःखासारखे, दुसऱ्या प्राण्याचे सुखदुःख आपल्या आत्म्यात पाहणार नाही.

(४८) हे नियम आणि उपनियम उचित वेळेस अथवा प्रति वर्षात, योग्य रीतीने जाहीर करून, संशोधित वा कमी-जास्त करता येऊ शकतील.

**ओ३म् सह नाववतु सह नौ भुनक्तु सहवीर्यं करवावहै**
**तेजास्विवावधीतमस्तु मा विद्धिषा वहै ॥**
**धेनुः परा दयापूर्वा यस्यानन्दाद्विराजते ।**
**आख्यायां निर्मितस्तेन ग्रन्थो गोकरुणानिधी ॥१॥**
**मुनिरामाङ्कचन्द्रेऽब्दे तपस्यस्यासिते दले ।**
**दशम्यां गुरुवारेऽ लङ्कृतोऽयं काम धेनुपः ॥२॥**
**॥इति गोकरुणानिधिः ॥**

१ विक्रम संवत १९३७ फाल्गुन बदि १० गुरुवार तदनुसार २४ फेब्रुवारी १८८१ च्या दिवशी हा ग्रंथ तयार झाला.

***

## यह स्वर्ण भारत भूमि, बस मरघट मही बन जायेगी

–राष्ट्रकवि स्वर्गीय मैथिलीशरण गुप्त

है कृषिप्रधान प्रसिद्ध भारत और कृषि की यह दशा ।
होकर रसा यह नीरसा अब होगई है कर्कशा ।
अच्छी उपज होती नहीं है, भूमि बहु परती पडी ।
गौ वंश का वध ही यहां है, याद आता हर घडी ।
यूरोप में कलके हलों से काम होता है यही ।
अन्यान्य पशुओं से भले ही जुत न क्यों जावे मही ।
गौ–वंश पर ही किन्तु है यह देश अवलम्बित सदा ।
पर दीन भारत, हाय! तेरे भाग्य में है क्या वदा ?
है भूमि बन्ध्या हो रही, वृष जाति दिन–दिन घट रही ।
घी–दूध दुर्लभ हो रहा, बल–वीर्य की जड कट रही ।
गौ–वंश के उपकार की सब ओर आज पुकार है ।
पर भी यहां उसका निरन्तर हो रहा संहार है ।
वह भी समय था एक, जो अब स्वप्न जा सकता कहा ।
घी तीस सेर विशुद्ध रुपये में हमें मिलता रहा ।
देहात में भी सेर भेर से अब अधिक मिलता नहीं ।
दुर्बल हुए हम आज यों, तनु भार भी झिलता नहीं ।
दांतो तले तृण दाबकर है दीन गायें कह रहीं ।
हम पशु तथा तुम हो मनुज, पर योग्य क्या तुमको यही ।
हमने तुम्हे मां की तरह है दूध पीने को दिया ।
देकर कसाई को हमें तुमने हमारा वध किया ।
जो जन हमारे मांस से निज देह पुष्टि विचार के ।
उदरस्थ हमको कर रहे हैं, क्रूरता से मार के ।
मालूम होता है, सदा धारे रहेंगे देह वे ।
या साथ ही ले जायेंगे उसको बिना संदेह वे ।

हां दूध पीकर भी हमारा पुष्ट होते ही नहीं ।
दधि घृत तथा तक्रादि से भी तुष्ट होते ही नहीं ।
तुम खून पीना चाहते हो तो यथेष्ट वही सही ।
नर-योनि हो, तुम धन्य हो, तुम जो करो थोडा वही ।
क्या वश हमारा है भला, हम दीन है बलहीन हैं ।
मारो कि पालो, कुछ करो तुम, हम सदैव अधीन हैं ।
प्रभु के यहां से भी कदाचित् आज हम असहाय हैं ।
इससे अधिक अब क्या कहें हां! हम तुम्हारी गाय हैं ।
बच्चे हमारे भूख से रहते समक्ष अधीर हैं ।
करके न उसका सोच कुछ देती तुम्हें हम क्षीर हैं ।
चरकर विपिन से घास फिर आती तुम्हारे पास हैं ।
होकर बडे वे वत्स भी बनते तुम्हारे दास हैं ।
जारी रहा क्रम यदि यहां यों ही हमारे ऱ्हास का ।
तो अस्त समझो सूर्य भारत भाग्य के आकाश का ।
जो तनिक हरियाली रही वह भी न रहने पायेगी ।
यह स्वर्ण भारतभूमि, बस मरघट मही बन जायेगी ।

***